**अनुसूचित क्षेत्रातील तेंदू संकलन व त्याच्या व्यवस्थापनासाठी ग्रामपंचायतीमार्फत ग्रामसभांना खेळते भांडवल उपलब्ध करून देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आविम-२०२०/प्र.क्र.३९/का-३

पहिला माळा,विस्तार इमारत
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय,मुंबई-४०००३२
तारीख: २६ मे, २०२०

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः शासन पत्र क्र.आविम-१०१४/प्र.क्र.४९/का-३, दि.१९/०४/२०१४
२) आदिवासी विकास महामंडळाचे पत्र क्र.आविम/विप/तेंदु पत्ता/१५२२/२०२०, दि.१४/०५/२०२०
३) प्रकल्प अधिकारी, धारणी यांचे पत्र क्र.प्र.अ/वै.शा./का-१/प्र.क्र./२२२९, दि.२१/०५/२०२० चे पत्र

**प्रस्तावना :**

राज्यातील काही आदिवासी क्षेत्रामध्ये मोठ्या प्रमाणात तेंदु संकलनाचे काम चालू असते. हे तेंदु संकलन सुरुवातीला वन विभागामार्फत महाराष्ट्र गौणवनोत्पादन (व्यापाराचे नियमन) अधिनियम-१९६९(१) अंतर्गत गोळा केले जायचे. तदनंतर दिनांक १९.०८.२०१४ रोजी मा.राज्यपाल यांनी पारीत केलेल्या अधिसुचनेप्रमाणे गौणवनोपज मध्ये तेंदु व केंदु पत्त्यांचाही समावेश करण्यात आला व ग्रामसभा व ग्रामपंचायतींना सर्व प्रकारची गौणवनोपज गोळा करण्याचे अधिकार मिळाले. तसेच अनुसूचित जमाती व इतर पारंपरिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ आणि नियम २००८ व सुधारणा नियम २०१२ अनुसार तेंदुपत्ता विक्रीची कार्यवाही संदर्भातील अधिकार ग्रामसभेचे आहेत.

गौणवनोपज मध्ये तेंदुपत्ता हा एक महत्वाचा गौणवनउपज आहे. या तेंदूपत्त्याचे संकलन जवळपास ५ ते ७ लाख स्टॅण्डर्ड बॅग इतक्या प्रमाणात महाराष्ट्रात दरवर्षी होते. या संकलनामुळे अंदाजे पाच लाख आदिवासी कुटुंबांना दरवर्षी रोजगार प्राप्त होतो. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी मार्फत ग्रुप ऑफ ग्रामसभा पायविहीर, ता.अचलपूर, जि.अमरावती यांची कोवीडमुळे लागु लॉकडाऊनच्या काळात तातडीची बाब म्हणून तेंदू संकलन व व्यवस्थापनासाठी खेळते भांडवल म्हणून आर्थिक सहाय्य करण्यासाठी प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. सदर अर्थसहाय्याअभावी ४५ ग्राम सभांमधील सुमारे ६ ते ७ हजार आदिवासी कुटुंबांना बिकट आर्थिक संकटास तोंड द्यावे लागणार आहे.

उपरोक्त परिस्थिती विचारात घेता, तेंदुपत्ता संकलन व त्याची विक्री हे आदिवासी कुटुंबांचे उपजिविकेचे महत्वाचे साधन असल्याने संबंधित ग्रामसभांना ग्रामपंचायतींमार्फत तेंदुपत्ता संकलन व व्यवस्थापन करण्यासाठी खेळते भांडवल उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी अतंर्गत तेंदुपत्ता संकलन व व्यवस्थापनासाठी ग्रामपंचायतीमार्फत ग्रामसभांना खेळते भांडवल उपलब्ध करून देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

यासाठी केंद्र शासनाकडून सन २०१८-१९ साठी भारतीय संविधानाच्या कलम २७५(१) अंतर्गत प्रक्रिया, वितरण, पणन इत्यादींसाठी शेतकरी उत्पादन संस्था स्थापन करण्याकरीता प्राप्त झालेल्या निधीपैकी रु. १ कोटी इतका निधी हा खेळते भांडवल म्हणून शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक यांना उपलब्ध करून देण्यात यावा. सदर योजनेची अंमलबजावणी ही शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ,नाशिक यांचेमार्फत करण्यात येईल. सदरहू निधीमधून शबरी महामंडळाने तेंदुपत्ता संकलन व व्यवस्थापनासाठी संबंधित ग्रामपचायतीमार्फत ४५ ग्रामसभांना खेळते भांडवल उपलब्ध करुन देण्यासाठी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी याना रू. १ कोटी वितरीत करावे. सदर निधीमधून प्रकल्प अधिकारी यांनी खेळते भांडवल खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून उपलब्ध करून द्यावे :-

१) खेळते भांडवल दिल्यावर ती रक्कम आर्थिक वर्षाच्या अखेरपर्यंत महामंडळास परतफेड केली जाईल याची दक्षता घ्यावी.
२) सदर निधी बिनव्याजी या कामासाठी वापरण्यास देण्यात येईल, मात्र दिलेल्या कालावधीत तो परत केला नाही तर रकमेची वसुली ही शासकीय नियमाप्रमाणे केली जाईल.
३) रु.५००/- च्या स्टँपपेपरवर तेंदुपत्ता संकलन व विक्री व्यवहारासंबंधीच्या अटी व शर्ती संदर्भातील करारनामा करण्यात यावा. त्यामध्ये खेळते भांडवल परतफेडीची बाब स्पष्टपणे नमूद करावी.
४) शबरी महामंडळामार्फत दिले जाणारे खेळते भांडवल महामंडळाचे शाखा व्यवस्थापक व ग्रामपंचायतीचे ग्रामसेवक अथवा संबंधित ग्रामसभेअंतर्गत स्थापन सामुहिक वनहक्क समितीचे अध्यक्ष यांच्या संयुक्त स्वाक्षरीने बँकेत खाते उघडून जमा करण्यात यावे.
५) महामंडळाला शासनाकडून भाग भांडवल व व्यवस्थापकीय अनुदान देण्यात येत असल्याने तेंदुपत्ता खरेदी-विक्री व्यवहारात सेवाशुल्क न घेता आवश्यक सेवा पुरविण्यात यावी.
६) या अंतर्गत मजुरी ही वन विभागाच्या प्रचलित दरापेक्षा कमी असू नये.

तेंदुपत्ता संकलन व व्यवस्थापनासाठी ग्रामपंचायतीमार्फत संबंधित ग्रामसभांना द्यावयाचे खेळते भांडवल व त्याची महामंडळास परतफेड करण्याच्या कार्यवाहीचे सनियंत्रण करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अधिकारी/पदाधिकारी | समिती पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (संबंधित) | अध्यक्ष |
| २ | प्रादेशिक व्यवस्थापक, आदिवासी विकास महामंडळ (संबंधित) | सदस्य |
| ३ | ग्रामपंचायतीचे सरपंच व उपसरपंच | सदस्य |
| ४ | शाखा व्यवस्थापक, शबरी वित्त व विकास महामंडळ | सदस्य सचिव |

तसेच वनहक्क कायदयाअंतर्गत ग्रामसभेकडून स्थापन सामूहिक वनहक्क समितीचे अध्यक्ष यांना आवश्यकतेनुसार प्रकल्प अधिकारी बैठकीस आमंत्रित करू शकतील. उपरोक्त समितीने वेळोवेळी बैठका घेवून ग्रामपंचायतीमार्फत ग्रामसभांना खेळते भांडवल हे तेंदुपत्ता गोळा करणे, पडी व्यवस्थापन, वाहतूक इत्यादी खर्च भागविण्याकरीता उपलब्ध करून देण्यासाठी निर्णय घ्यावा. समितीने ग्रामसभांकडून तेंदुपत्ता विक्रीनंतर त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीमधून खेळते भांडवल महामंडळास परतफेड करण्यासाठी पाठपुरावा करावा. या समितीने उपरोक्त कार्यवाहीचा अहवाल वेळोवेळी शबरी वित्त व विकास महामंडळास उपलब्ध करुन द्यावा. याशिवाय पेसा ५ टक्के अबंध निधीमधून या प्रयोजनासाठी ग्रामसभांना निधी उपलब्ध करून देण्याची मुभा ग्रामपंचायतींना राहील.

ग्रामपंचायतीमार्फत ग्रामसभांना तेंदुपत्ता संकलन व व्यवस्थापनासाठी खेळते भांडवल देण्याची योजना ही लॉकडाऊनमुळे उद्भवलेल्या परिस्थितीत लागू करण्यात येत असल्याने ही योजना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठीच लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५२६१६०२३४८१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, serialNumber=e714bbcd4d43c6782884c7e7a2091f9f1edc1d97ebb542c48b98fb8c8bdd6cf4, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2020.05.26 16:09:28 +05'30'

**( ल.गो.ढोके )**

**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
३. मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव.

४. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव.
५. मा.संसद सदस्य (सर्व).
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा)
७. मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद)
८. मा.विधीमंडळ सदस्य (सर्व).
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
११.अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
१६.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१७.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१८.विभागीय आयुक्त,अमरावती.
१९. जिल्हाधिकारी,अमरावती.
२०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,अमरावती.
२१. अपर आयुक्त, अमरावती.
२२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२३.कोषागार अधिकारी, अमरावती.
२४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,धारणी.
२५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२६.संचालक (लेखा व कोषागारे), संगणक कक्ष, नवीन प्रशासन विभाग, मुंबई.
२७.महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक/नागपूर.
२८.सर्व सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९.सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०.निवडनस्ती, कार्यासन क्र.३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

*****************